**राज्यातील शेतक-यांना कर्जपुरवठा करणा-या त्रिस्तरीय पत संरचनेवर कोविड-१९/ लॉकडाऊनचे होणारे दूरगामी परिणाम व त्यावरील उपाययोजना याबाबत अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ०५२०/ प्र.क्र.६७/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २७ मे, २०२०

**प्रस्तावना :-**

कोविड-१९ च्या विषाणूजन्य रोगाचा संपूर्ण जगभर प्रादुर्भाव झाल्यामुळे केंद्र शासनाने दि.२४.३.२०२० रोजी संपूर्ण देशात लॉकडाऊन जाहीर केला आहे. विशेषत: या रोगाचा महाराष्ट्रात मोठया प्रमूाणात प्रादुर्भाव झाला आहे. सदर लॉकडाऊन मुळे संपूर्ण देशात सामाजिक व आर्थिक जनजीवन विस्कळीत झाले आहे. या रोगाच्या प्रादुर्भावाचे राज्याच्या अर्थव्यवस्थेवर दूरगामी परिणाम होण्याची शक्यता आहे. परिणामी, राज्यातील सहकार क्षेत्रावर देखील हे परिणाम होणार आहेत.

२. महाराष्ट्र राज्याच्या अर्थव्यवस्थेत सहकार चळवळीचे योगदान महत्त्वाचे आहे. राज्यात सुमारे दोन लाख सहकारी संस्था कार्यरत असून राज्यातील ५.५ कोटी नागरिक विविध सहकारी संस्थांचे सभासद आहेत. राज्याच्या सहकार क्षेत्रातील खेळते भांडवल सुमारे ३.५ लाख कोटी असून सहकार क्षेत्रात सुमारे ३.० लाख पेक्षा जास्त कर्मचारी कार्यरत आहेत.

३. विशेषत: राज्यातील शेतक-यांना शेती/ पिक कर्ज पुरवठा करण्यात जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे योगदान महत्त्वाचे आहे. त्या दृष्टीने राज्यातील शेतक-यांना कर्जपुरवठा करणा-या त्रिस्तरीय पत संरचनेवर कोविड-१९/ लॉकडाऊनचे होणारे दूरगामी परिणाम व त्यावरील उपाययोजना याबाबत अभ्यास करुन उपाययोजनेसह शासनास अहवाल सादर करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | श्री. अनिल कवडे, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे - | अध्यक्ष |
| २) | डॉ.आनंद जोगदंड, अप्पर आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे - | सदस्य |
| ३) | श्री. श्रीकृष्ण वाडेकर, विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर- | सदस्य |

४) श्री.अजित देशमुख, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई- सदस्य

५) श्री. शैलेश कोतमिरे, प्रशासक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, सोलापूर - सदस्य

६) डॉ. संतोष कोरपे, चेअरमन, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, अकोला - सदस्य

७) श्री. प्रताप चव्हाण, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, पुणे- सदस्य

८) श्री. अशोक खरात, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, बुलढाणा- सदस्य

९) श्री. डी. एस. साळुंखे, उपनिबंधक, सहकारी संस्था, मुख्यालय, पुणे - सदस्य सचिव

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल :-

१) राज्यातील शेतक-यांना कर्जपुरवठा करणा-या त्रिस्तरीय पत संरचनेवर कोविड-१९/ लॉकडाऊनचे होणारे दूरगामी परिणामांचा अभ्यास करणे.

२) राज्यातील शेतक-यांना कर्जपुरवठा करणा-या त्रिस्तरीय पत संरचनेवर कोविड-१९/ लॉकडाऊनचे होणारे दूरगामी परिणामांच्या अनुषंगाने शासनास उपाययोजना सुचवून अहवाल सादर करणे.

३) सदरहू समितीने आपला अहवाल दोन महिन्यात सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००५२७१२०६४४०७०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.05.27 13:01:19 +05'30'

( रमेश शिंगटे )
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) श्री. अनिल कवडे, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
३) डॉ.आनंद जोगदंड, अप्पर आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
४) श्री. श्रीकृष्ण वाडेकर, विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर
५) श्री.अजित देशमुख, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई
६) श्री. शैलेश कोतमिरे, प्रशासक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, सोलापूर
७) डॉ. संतोष कोरपे, चेअरमन, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, अकोला
८) श्री. प्रताप चव्हाण, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, पुणे
९) श्री. अशोक खरात, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, बुलढाणा
१०) श्री. डी. एस. साळुंखे, उपनिबंधक, सहकारी संस्था, मुख्यालय, पुणे

११) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१३) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) निवड नस्ती.